**एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१०**

**राज्य सेवा (मुख्य) परिक्षा-२०२१ च्या अंतिम निकालाच्या आधारे मुदतवाढ देण्यात आलेल्या आयोग पुरस्कृत परिविक्षाधीन सरकारी कामगार अधिकारी (गट-ब) यांच्यासाठी अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत ....**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**

**शासन आदेश क्रमांकः टीआरएन-११२४/प्र.क्र.२२८/कामगार-८**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक: ३० एप्रिल, २०२५

संदर्भ :-

१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन-२०१३/प्र.क्र. ८४/१३/१२-अ, दि. २०.०१.२०१४.

२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.टिआरएन-१११७/प्र.क्र.६६/सीपीटीपी, दि.२०.०५.२०२१

३) सामान्य प्रशासन विभाग, कार्यालयीन आदेश क्रमांक टिआरएन-११२४/प्र.क्र.८४/प्रशि-३, दि. २१.०२.२०२५.

४) शासन पत्र, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग क्रमांक, टीआरएन-११२४/प्र.क्र.२२८/कामगार-८, दि.३०.०४.२०२५.

प्रस्तावना:-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्य सेवा परिक्षेद्वारे सन २०१४ पासून प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ मधील संवर्गासाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट-ब मधील पदांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत दोन वर्षांच्या कालावधीसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. त्याअनुषंगाने उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या अधिपत्याखालील कामगार आयुक्तालयातील सहायक कामगार आयुक्त (गट-अ) व सरकारी कामगार अधिकारी (गट-ब) संवर्गाचा समावेश संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ येथील आदेशान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्य सेवा (मुख्य) परीक्षा-२०२१ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या तथापि मुदतवाढ देण्यात आलेल्या गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांना प्रशिक्षणार्थी अधिकारी म्हणून नियुक्ती देण्यात आली असून त्यांचे प्रशिक्षण एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० (सीपीटीपी-१०) अंतर्गत वनामती, नागपूर येथे दि.०२ एप्रिल, २०२५ पासून सुरु झाले आहे. सदर प्रशिक्षणासाठी प्रत्यक्ष उपस्थित झालेल्या उमेदवाराच्या संख्येच्या मर्यादेत अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ येथील आदेशान्वये सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सीपीटीपी-१० अंतर्गत सरकारी कामगार अधिकारी (गट-ब) संवर्गातील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांच्या सेवाविषयक बाबींची पूर्तता करण्यासाठी संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये अपर कामगार आयुक्त, नागपूर यांना नोडल अधिकारी म्हणून नियुक्त करण्यात आले आहे.

**शासन आदेश:-**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या अधिपत्याखालील कामगार आयुक्तालयांतर्गत सरकारी कामगार अधिकारी (गट- ब) संवर्गातील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्य सेवा (मुख्य) परीक्षा - २०२१ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या तथापि मुदतवाढ देण्यात आलेल्या व प्रशिक्षणासाठी वनामती, नागपूर येथे प्रत्यक्ष रूजू झालेल्या एकूण ०२ उमेदवारांकरिता सुधारित वेतन मॅट्रिक्समधील वेतनस्तर एस-१५ (४१८००-१३२३००) मध्ये एकूण ०२ अधिसंख्य पदे दिनांक ०२.०४.२०२५ ते ०१.०४.२०२७ या दोन वर्षांच्या कालावधीसाठी निर्माण करण्याकरिता शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर ०२ अधिसंख्य पदे उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभागाच्या अधिपत्याखालील कामगार आयुक्त, मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

३. कामगार आयुक्त, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सरकारी कामगार अधिकारी (गट-ब) संवर्गातील सदर ०२ अधिसंख्य पदांच्या दिनांक ०२.०४.२०२५ ते ०१.०४.२०२७ या दोन वर्षांच्या कालावधीतील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांच्या वेतनावर होणारा खर्च मागणी क्रमांक के-८, मुख्य लेखाशिर्ष ३४५१, ००३-प्रशिक्षण (००) (०१) शासकीय कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण (कार्यक्रम) (३४५१२८९१) अंतर्गत २०- इतर प्रशासकीय खर्च या लेखाशिर्षामधून त्या-त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ येथील आदेशान्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० (सीपीटीपी-१०) साठी मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार सदर प्रशिक्षार्थी अधिकाऱ्यांची सेवार्थ प्रणालीमध्ये नोंदणी करणे, डीसीपीएस क्रमांक मिळविणे, त्यांच्या वेतनासाठी आहरण व संवितरण अधिकारी नियुक्त करणे, परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना प्रशिक्षणाच्या पहिल्या महिन्यापासून संबंधित पदाचे नियमित वेतन प्रदान करणे, परिविक्षाधीन अधिकाऱ्यांची सेवापुस्तके तयार करणे इ. कार्यवाही प्रशिक्षणाच्या सुरुवातीच्या ४ आठवड्यात करण्याच्या सूचना आहेत. सबब, सदर परिपत्रकातील निर्देश विचारात घेऊन आवश्यक कार्यवाही नोडल अधिकारी म्हणून अपर कामगार आयुक्त, नागपूर यांनी कामगार आयुक्त यांच्या मार्गदर्शनाखाली करावी.

५. सदर शासन आदेश, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४३०१७१५५७९२१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRINIVAS DATTATRAY JIREWAR

Digitally signed by SHRINIVAS DATTATRAY JIREWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT,
2.5.4.20=42139af095588a908db2916824ef6535970d3af8d589339252ef98696d4e0256, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D151C0F56009AFC3BB3618879DFEE67817426CBEE059F11116E801CAE1B9CF72, cn=SHRINIVAS DATTATRAY JIREWAR
Date: 2025.04.30 17:16:47 +05'30'

**(श्रीनिवास जिरेवार)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. कामगार आयुक्त,कामगार भवन, ई-ब्लॉक, सी-२०,वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.

२. अपर कामगार आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर, नवीन प्रशासकीय इमारत क्र.२, सिव्हिल लाईन, नागपूर-४४० ००१.

**प्रत माहितीसाठी,**

१. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र,  मुंबई ४०० ०२०.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
३. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
५. उप सचिव( प्रशा-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. उप सचिव (सीपीटीपी कक्ष) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. उप सचिव (वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. संचालक (सीपीटीपी), वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, व्हीआयपी रोड, धरमपेठ, नागपूर-४४० ०१०.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. निवडनस्ती, (कामगार-८)